# श्री गुरुदेव दत्त



श्री दत्तगुरू मंचातर्फे आपले हार्दिक स्वागत

http://portal.myarpan.in

Shri Dattaguru ह्या website च्या माध्यमातून नवनवीन माहिती सर्वांपर्यंत पोहोचवण्याचा मानस आहे. ह्या website वरील सर्व मजकूर हा स्वअभ्यासित आणि स्वलिखित स्वरूपाचा आहे त्यामुळे website ला Credit देऊन त्यावरील मजकूर Share करू शकता परंतु त्याचे कोणत्याही प्रकारचे पुनर्मुद्रण (Print, Digital, Audio, Video) पूर्व परवानगी शिवाय करता येणार नाही, त्यासाठी Feedback देऊन Site Admin शी संपर्क साधावा.

# :: १.योगीराज ::



© fb.me/shri.dattaguru
© fb.me/shri.dattaguru
योगीराज
(जन्म : कार्तिक शुद्ध पौर्णिमा)
ब्रम्हदेवाचे मानस पुत्र ऋषी अत्री व त्यांच्या धर्मपत्नी माता अनसूया ह्या दोघांनी पुत्रप्राप्तीसाठी हिमालात जाऊन घोर तपश्चर्या केली. त्यांच्या ह्या निर्गुण घोर तपश्चर्येचे फलस्वरूप साक्षात दत्तात्रेयांनी अवतार घेतला. स्फटीकाप्रमाणे ज्योतिर्मय रूप धारण केले. एकमुखी– चतुर्भुज, प्रत्यक्ष भगवान श्री विष्णुस्वरूप हा अवतार योगमार्गाचा पुरस्कर्ता बनला. योगीराज ह्या नावाने नावलौकिक मिळवून योगमार्गाने लोकांना सुखी केले.
© fb.me/shri.dattaguru
© fb.me/shri.dattaguru

# :: २.अत्रीवरद ::


© fb.me/shri.dattaguru
अत्रिवरद
(जन्म : कार्तिक कृष्ण प्रतिपदा)
ऋषी अत्रींनी ऋक्ष पर्वतावरील परमतीर्थावर 100 वर्षे तप केले. त्यांना वरदान देण्या हेतूने ***अत्रीवरद*** हया नावाने योगीराज अवतरले. ***ब्रम्हा – विष्णू– महेश्वर*** हयांचे साक्षात दर्शन अत्रिमुनींना झाले खरे परंतु त्यांच्या मनात एक प्रश्न उत्पन्न झाला कि त्यांनी जर ध्यान एकाच देवाचे केले असता त्रिदेव कसे प्रगट झाले? परंतु देवांच्या मधुर वाणीने अत्रींच्या हया निरागस प्रश्नाचे निरसन केले. अत्रीमुनी ज्याचे ध्यान करीत होते तो त्रिदेवांचा अंश आहे आणि तिघात समाविष्ट आहे. हे ऐकून ऋषी अत्रींना परम आनंद झाला. ***अत्रीवरदाचे*** स्वरूप तप्त सुवर्णकान्तीप्रमाणे ***तेजस्वी, हसतमुख*** आणि ***षड्भुज*** होते.
© fb.me/shri.dattaguru

# :: ३.दत्तात्रेय ::


© fb.me/shri.dattaguru
दत्तात्रेय
(जन्म : कार्तिक कृष्ण द्वितीया)
अत्री ऋषींना दत्तात्रेय स्वरूप साक्षात अत्रीवरदांकडून वरदान प्राप्त झाले. ऋषी अत्रींना त्यांच्या सारखे पुत्ररत्न प्राप्त झाले. ते दिगंबर, लोभस रूप मदनासारखे सुंदर, नीलमण्यासमान तेजस्वी होते. मुख चंद्रमासारखा, चतुर्भुज असा हा अवतार दत्तात्रेय नावाने प्रचलित झाला.

# :: ४.कालाग्निशमन ::


© fb.me/shri.dattaguru
दत्तात्रेय
(जन्म : कार्तिक कृष्ण द्वितीया)
अत्री ऋषींना दत्तात्रेय स्वरूप साक्षात अत्रीवरदांकडून वरदान प्राप्त झाले. ऋषी अत्रींना त्यांच्या सारखे पुत्ररत्न प्राप्त झाले. ते दिगंबर, लोभस रूप मदनासारखे सुंदर, नीलमण्यासमान तेजस्वी होते. मुख चंद्रमासारखा, चतुर्भुज असा हा अवतार दत्तात्रेय नावाने प्रचलित झाला.
© fb.me/shri.dattaguru

# :: ५.योगीजनवल्लभ ::


© fb.me/shri.dattaguru
योगीजनवल्लभ
(जन्म : मार्गशीर्ष शुद्ध पौर्णिमा)
दाहाग्नी शमवल्या नंतर या *कालाग्निशमना*च्या दर्शनास देव, ऋषी, गंधर्व, यक्ष, किन्नर आदि जमा झाले. सर्वांवर आपल्या कृपाशिर्वादाचा वर्षाव करण्याहेतू दत्तात्रेयांनी आपले *कालाग्निशम* हे बालरूप त्यागून योगीजनांच्या प्रिय रूपात अवतरीत झाले. हा अवतार *योगीजनवल्लभ* नावाने प्रसिद्ध झाला.
© fb.me/shri.dattaguru

# :: ६.लिलाविश्वंभर ::


© fb.me/shri.dattaguru
© fb.me/shri.dattaguru
लिलाविश्वंभर
(जन्म : पौष शुद्ध पौर्णिमा)
जेव्हा भूतलावर अवर्षणामुळे लोक अन्नान्न दशेस लागले होते, जेव्हा राजकर्त्यांकडून लुबाडणूक झाल्यामुळे समस्त प्रजाजन त्रस्त झाले होते, तेव्हा जनहितार्थ आणि ह्या पिडांमधून लोकांना मुक्त करण्याच्या प्रयोजनाने दत्तात्रेयांनी लिलाविश्वंभर हा अवतार घेऊन लोकांचा उद्धार केला.
© fb.me/shri.dattaguru
© fb.me/shri.dattaguru

# :: ७.सिद्धराज ::


© fb.me/shri.dattaguru
सिद्धराज
(जन्म : माघ शुद्ध पौर्णिमा)
श्री दत्तात्रेय भ्रमंतीहेतू *बद्रिकावनात* गेले असता त्यांना अनेक साधू, योगीजानांचे दर्शन झाले. त्यांच्या गर्वहरण प्रीत्यर्थ दत्तात्रेयांनी *बालरूप* धारण केले. *सिद्धराज* नावाच्या ह्या दत्तात्रेयरूपी बालकाने नानाविध चमत्कार घडवून या सिद्धांचे गर्वहरण केले. त्यांना शरण आलेल्या सर्व सिद्धमुनींना योगदीक्षा देऊन *दत्तात्रेयांनी* त्यांचा उधार केला.
© fb.me/shri.dattaguru

# :: ८.ज्ञानसागर ::


© fb.me/shri.dattaguru
© fb.me/shri.dattaguru
ज्ञानसागर
(जन्म : फाल्गुन शुद्ध दशमी)
सिद्धीला कामनेची जोड नसावी हे पटवून देण्याकरिता दत्तात्रेयांनी रूपातीत, गुणातीत, ज्ञानयोगमुक्त असा
अवतार धारण केला. हा अवतार ज्ञानसागर नावाने पुढे प्रचलित झाला.
© fb.me/shri.dattaguru
© fb.me/shri.dattaguru

# :: ९.विश्वंभरावधूत ::


© fb.me/shri.dattaguru
विश्वंभरावधूत
(जन्म : चैत्र शुद्ध पौर्णिमा)
पुढे दत्तात्रेयांनी आणखी काही सिद्धांना बोध देण्यासाठी *विश्वंभरावधूत* हा अवतार घेतला. ह्या अवतारात *श्री दत्तात्रेयांनी* योगिजनांना, सिद्धांना *बीजाक्षर मंत्र द्रां* चा उपदेश केला.
© fb.me/shri.dattaguru

# :: १०.मायामुक्तावधूत ::


© fb.me/shri.dattaguru
मायामुक्तावधूत
(जन्म : वैशाख शुद्ध पौर्णिमा)
भक्तांच्या अंत:करणातील प्रेम आणि देवावरील श्रद्धा दृढ करण्यासाठी दत्तात्रेय मायामुक्तावधूत या अवतारात अवतरीत झाले. भक्तांना मोहमायाचे ज्ञान करून देऊन ते त्यागणे उचित हे पटवून दिले आणि योगमार्गाच्या आचरणाचा उपदेश केला.
© fb.me/shri.dattaguru

# :: ११.मायायुक्तावधूत ::


© fb.me/shri.dattaguru
मायायुक्तावधूत
(जन्म : जेष्ठ शुद्ध त्रयोदशी)
दत्तात्रेयांनी आकराव्या रूपात अवतार घेतला आणि तो अवतार *मायायुक्तावधूत* या नावाने प्रचलित झाला. ह्या अवतारात दत्तात्रेयांचे रूप हे *सावळे, सुंदर, सुकुमार* असे होत. हा अवतार त्यांनी भक्तांना योगमायेतून मुक्त करण्यासाठी घेतला होता.
© fb.me/shri.dattaguru
© fb.me/shri.dattaguru
© fb.me/shri.dattaguru

# :: १२.आदिगुरु ::


© fb.me/shri.dattaguru
आदिगुरु
(जन्म : आषाढ शुद्ध पौर्णिमा)
मदलसेचा पुत्र अलर्क यास योगाचा आणि तत्त्वज्ञानाचा उपदेश करण्यासाठी दत्तात्रेयांनी बारावा अवतार घेतला
तो आदिगुरु ह्या नावाने प्रचलित झाला.
© fb.me/shri.dattaguru

# :: १३.शिवरूप ::



© fb.me/shri.dattaguru
शिवरूप
© fb.me/shri.dattaguru
(जन्म : श्रावण शुद्ध अष्टमी)
एकदा दत्तात्रेय एका काळ्या आवळीच्या झाडाखाली प्रकट झाले. हे रूप तेजस्वी आणि कृष्णवर्णीय होते. हा
अवतार शिवरूप म्हणून पुढे ओळखला जाऊ लागला.
© fb.me/shri.dattaguru
© fb.me/shri.dattaguru

# :: १४.देवेश्वर ::


© fb.me/shri.dattaguru
देवेश्वर
(जन्म : भाद्रपद शुद्ध चतुर्दशी)
दत्तात्रेयांचा चौदावा अवतार हा देवदेवेश्वर नावाने ओळखला गेला.
© fb.me/shri.dattaguru

# :: १५.दिगंबर ::


© fb.me/shri.dattaguru
दिगंबर
(जन्म : अश्विन शुद्ध पौर्णिमा)
ययाती– देवयानी पुत्र यदुने जेव्हा आत्मसाक्षात्कारासाठी वनांचा मार्ग धरला तेव्हा दत्तात्रेयांनी योगिरूपात प्रगट होऊन त्यांचे मार्गदर्शन यदूस दिले. हा अवतार दिगंबर नावाने प्रचलित आहे. दत्तात्रेयांनी त्यांना निसर्गातून मिळालेल्या 24 गुरूंची अनुभूतू कथन करून जीवनाचा पुढील मार्गास यदु राजाला प्रोत्साहित केले. चिरंतन आणि क्षणिक यातील फरक समजावला आणि योगमार्ग उचित असे सांगितले.
© fb.me/shri.dattaguru

# :: १६.कमललोचन ::


© fb.me/shri.dattaguru
© fb.me/shri.dattaguru
कमललोचन
(जन्म : कार्तिक शुद्ध पौर्णिमा)
शेवटी दत्तात्रेय कमललोचन नावाचा अवतार घेऊन लोककल्याणाकरिता पुन्हा एकदा अवतरीत झाले आणि कृपाशीर्वाद सर्वांना दिला.
© fb.me/shri.dattaguru
© fb.me/shri.dattaguru

# :: दत्तात्रेयांचे १६ अवतार ::

## (नामावली )



